


**महसूल व वन विभाग**
पहिला मजला, मुख्य इमारत, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
Email ID : j7.revenue@maharashtra.gov.in

---

**क्र. जमीन २०२५/प्र.क्र.११/ज-७** **दिनांक: ११ फेब्रुवारी २०२५**

**विषय-** दिल्ली मुंबई इंडस्ट्रियल कॉरिडोर (डीएमआयसी) या प्रकल्पासाठी **मौजे बंन्नीतांडा**, मौजे बिडकीन, ता.पैठण, जि.छत्रपती संभाजीनगर येथील भूसंपादित जमिनी नियमानुकूल करण्याबाबत. (अर्जदार - **श्री. जयेश माणिक राठोड अपाक माणिक खिरा राठोड**)

**संदर्भ-** १. जिल्हाधिकारी**,** छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र
जा. क्र. २०२३/मशाका-२/जमीन-२/गायरान/नि.कु./कावी-२७५ दि.२६.०९.२०२४
२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. जमीन २०२२/प्र.क्र.१०६/ज-१
दि.०५.०७.२०२३

**शासन आदेश :-**

श्री. जयेश माणिक राठोड अपाक माणिक खिरा राठोड यांनी धारण केलेल्या मौजे बिडकीन, ता.पैठण, जि.छत्रपती संभाजीनगर येथील येथील गट क्र.७८१/२ मधील क्षेत्र १ हे. ९१ आर (खरेदीखत क्र. १८५३, दि.२४.०३.२००४ आणि खरेदीखत क्र. ४५५९, दि.२०.०८.२००३) या जमिनीचे हस्तांतरण प्रक्रियेमध्ये झालेला खरेदी विक्री व्यवहार शासनाच्या परवानगीशिवाय झाल्यामुळे सदर व्यवहार हा शर्तभंग ठरत आहे.

सबब, महाराष्ट्र जमीन महसूल संहिता १९६६ मधील कलम ३७ (अ) मधील व शासन निर्णय, महसूल व वन विभाग दि.०५.०७.२०२३ मधील तरतूदी विचारात घेता, उक्त नमूद अर्जदार यांचा मौजे बिडकीन, तालुका पैठण, जिल्हा छत्रपती संभाजी नगर येथील येथील गट क्र. ७८१/२ मधील क्षेत्र (०.४०+१.५१) १ हे. ९१ आर या जमीन हस्तांतरण प्रकरणामध्ये शेवटचा शर्तभंग (खरेदीखत क्र. १८५३, दि.२४.०३.२००४ आणि खरेदीखत क्र. ४५५९, दि.२०.०८.२००३) पुढील अटी व शर्तीस अधीन राहून नियमानुकूल करण्यास मान्यता देण्यात येत आहे.-

अटी व शर्ती :

१. मौजे बिडकीन, ता.पैठण, जि.छत्रपती संभाजीनगर येथील गट क्र.७८१/२ मधील क्षेत्र १ हे. ९१ आर (खरेदीखत क्र. १८५३, दि.२४.०३.२००४ आणि खरेदीखत क्र. ४५५९, दि.२०.०८.२००३) या जमिनीबाबत खरेदी-विक्री व्यवहार सक्षम प्राधिकाऱ्याच्या परवानगीविना झालेला असल्याने सदरचा शर्तभंग नियमानुकूल करण्याकरिता महसूल व वन विभागाच्या शासन निर्णय दि.०५.०७.२०२३ मधील तरतूदीनुसार अनर्जित उत्पन्नाची रक्कम जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर यांनी संबंधितांकडून वसूल करावी.
२. प्रस्तुत रक्कम परिगणना करताना शासनाचा कोणत्याही प्रकारे महसूल बुडणार नाही/शासनाचे कोणतेही आर्थिक नुकसान होणार नाही याची दक्षता जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर यांनी घ्यावी.

३. तसेच प्रस्तुत प्रकरणी केवळ शर्तभंग नियमानुकूल करण्याबाबत याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत असल्याने त्यानुषंगाने जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर यांनी आवश्यक ती पुढील कार्यवाही करावी.

४. संबंधित अर्जदार हे अनुसूचित जाती/जमातीमधील आहेत किंवा कसे याची खात्री करावी. तसेच अर्जदाराकडून आधार कार्ड, मतदान ओळख पत्र, पॅन कार्ड इत्यादी आवश्यक ओळखपत्र पुराव्याची खातरजमा करावी.

५. सदरहू जमीन कृषिक प्रयोजनार्थच भोगवटादार वर्ग- २ म्हणून कायम राहील.

६. सदरहू जमिनीची शासनाच्या/जिल्हाधिकारी यांच्या पूर्व परवानगीशिवाय हस्तांतरण/विक्री करता येणार नाही. तसेच गहाण/तारण ठेवता येणार नाही अथवा भाडेपट्टयाने देता येणार नाही.

७. सद्य:स्थितीत सदर जमिनीबाबत कोणताही दावा न्यायप्रविष्ठ नाही, याबाबत जिल्हाधिकारी यांनी पुन:श्च खात्री करुन घ्यावी.

८. जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर यांना योग्य वाटतील त्या अन्य अटी व शर्ती समाविष्ट करण्याचा अधिकार राहील.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०२१११५४१२३६९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SANJAY AUDUMBAR DHARURKAR
Date: 2025.02.11 15:52:49 +05'30'

**(संजय धारुरकर)**
**उप सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१. विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर
२. जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर
३. उपविभागीय अधिकारी, पैठण, जि.छत्रपती संभाजीनगर
४. तहसिलदार, छत्रपती संभाजीनगर/पैठण, जि.छत्रपती संभाजीनगर
५. श्री. जयेश माणिक राठोड अपाक माणिक खिरा राठोड,मौजे बिडकीन, ता.पैठण, जि.छत्रपती संभाजीनगर
६. निवडनस्ती (कार्यासन ज-७)